


# 'मराठीतील प्रकाशपूजक कविता'

**डॉ. संजय जनार्दन आगलावे**

प्राध्यापक, मराठी विभाग, जे. डी. पाटील सांगळूदकर महाविद्यालय, दर्यापूर जिल्हा, अमरावती

भारतीय संस्कृती ही प्रकाश पूजक संस्कृती आहे प्रकाश म्हणजेच तेजाची पूजा केली जाते प्रकाशाला प्रगतीचे, उन्नतीचे प्रतीक मानले जाते तिमिराकडून तेजाकडे आपण प्रवास केला पाहिजे म्हणून कुठल्याही कार्यक्रमाची सुरुवात दीपप्रज्वलनाने आपण करत असतो, भारतीय संस्कृतीची मूळ भावना आणि परंपरा प्रकाशपूजेवर आधारित आहे. अज्ञानाच्या अंधारातून ज्ञानाच्या प्रकाशाकडे वाटचाल करण्याचा हा एक प्रवास आहे. दीपप्रज्वलन ही फक्त एक कृती नसून, एक संदेश आहेकृआपल्या जीवनातील अंधकार, दुःख आणि निराशा यांचा नाश करून आत्मप्रकाशाने भरलेला जीवनप्रवास घडवावा.

प्रकाश हे केवळ बाह्य विश्वातील तेज नसून त्याला ज्ञान, आध्यात्मिक उन्नती, आशा आणि ऊर्जा यांचे प्रतीक मानले जाते. भारतीय संस्कृतीत, विशेषतः मराठी कवितांमध्ये, "प्रकाशपूजक" भावधारेशी जोडलेल्या अनेक कवितांनी या तेजाच्या विविध रूपांचे सुंदर चित्रण केले आहे. अशा कविता अंधारातून तेजाकडे वाटचाल करण्याची प्रेरणा देतात. प्रस्तुत लेखात सुधीर मोघे, बहिणाबाई चौधरी, कुसुमाग्रज, नामदेव ढसाळ यांसारख्या महान कवींनी त्यांच्या कवितेतून मानवी मनाला प्रकाशित करण्याचे, समाजाला प्रबोधन देण्याचे कार्य कसे साधले आहे, याचा आढावा या लेखात घेतला आहे.

'फिटे अंधाराचे जाळे' हे सुधीर मोघे यांनी लिहलेले सुप्रसिद्ध एक प्रेरणादायी प्रकाशकाव्य आहे, जेव्हा नैराश्याच्या गर्तेत आपण सापडतो तेव्हा हे गीत देते आहे,' फिटे अंधाराचे जाळे, झाले मोकळे आकाश'अंधाराचे साम्राज्य संपून ,सर्वत्र प्रकारच्या वाटा प्रशस्त झाल्या दऱ्या खोऱ्यातून प्रकाश वाहे म्हणजे जीथे अंधार पसरला होता अशा ठिकाणी प्रकाश पोहचला, "सूर्य डोंगरावर जन्मला" ही ओळ मनात नवप्रभेचा आनंद निर्माण करते; त्या नवीन तेजाने निसर्गाच्या प्रत्येक भागाला नवसंजीवनी मिळते. गवतावरचा दव, पाखरांच्या ओठांवरची गाणी, आणि नव्याने जागृत झालेल्या पायवाटा या साऱ्या प्रतीकांतून जीवनातील ताजेपणाचे वर्णन होते. या गाण्यात जीवनातील चिरंतन चैतन्य, उत्साह, आणि नवी आशा यांचे सुरेख मिश्रण आहे. हे गीत केवळ काव्यात्मक नाही, तर अस्तित्वातील निराशा संपविणाऱ्या मानसिकतेची प्रेरणा आहे.रोज काळोख नष्ट होवून सूर्य उगवतो हे सृष्टीचक्र रोजचेच असले तरी त्यात नव्याचा आनंद आहे.

बहिणाबाई चौधरींची "उगवले नारायण" ही कविता सूर्याच्या आगमनातून सृष्टीतील नवचैतन्याचे प्रतीक आहे. "उगवले नारायण, उगवले गगनांत" या ओळींतून कवयित्रीने एक नवीन दिवसाची सुंदर सुरुवात वर्णिली आहे. सूर्याच्या आगमनाने तिचे घर सोन्याच्या प्रकाशाने उजळून जाते; हे सोने फक्त भौतिक तेजाचे नसून आत्मिक उजळण्याचेही प्रतिक आहे. सूर्याच्या सोनसळी प्रकाशात तिच्या अंगणातील तुळस, अंजीरी, आणि पारिजातक आनंदाने नटलेले दिसतात. निसर्गातील प्रत्येक घटक आपले भाग्य उजाळताना दिसतो, आणि कवयित्रीही या प्रसन्नतेचा अनुभव घेत असल्याचे दिसते. 'उगवले नारायण': बहिणाबाईंच्या शब्दांत सृष्टीतील उत्सव आहे, सुर्य नारायणाच्या आगमनाने तीचे घर कसे उजळून निघाले आहे याचे वर्णन बहिणाबाई यांनी केले आहे,

उगवले नारायण उगवले गंगनांत
प्रभा सोनियाची फांके उन्हे आली अंगणात.

अंगणात पडलेला फुलांचा सडा बघून जणू. मोती रत्नाच्या राशी. वाटाव्या, वैभवाला अंत नाही,आपल्याला जे काही मिळाले या बद्दल बहिणाबाई समाधानी आहे, अशा प्रकारे निसर्गाचे वैभवशाली रत्नमाणिक रुपी सुख वेचायला तीला मिळत आहे या बद्दल ती स्वतःला भाग्यवान समजते.

'ज्योत'ही वि.म.कुलकर्णी यांची प्रसिद्ध कविता आहे,ज्योतीच्या विविध रुपाचे दर्शन या कवितेत होतांना दिसते,

'आधी होते मी दिवटी
शेतकऱ्यांची आवडती
झाले इवली मग पणती
घरांघरांतुन मिणमिणती'

शेतकऱ्यांची आवडती दिवटी, घरांघरांतुन मिणमिणती पणती. असे तीला स्वरूप प्राप्त झाले. देवापुढे ठेवून तीला. समई म्हणतात, बाहेर काढल्यावर ती काळासा धूर सोडते.कोणी ज्योतीला काचेच्या महालात ठेवतात,त्याला कंदील म्हटले जाते. पुढे लग्नाच्या वरातीत बत्तीचे नवे रुप प्राप्त, वरातीत तीच्या वाचून झगमगाट होवू शकत नाही.

विज्ञान युगात तीचे स्वरूप बदलेले आहे, तीला आता बिजली म्हटले जाते, घरे आणि मंदिरे लखलखीत झाली, भविष्यात तीच्यात कोणता बदल होईल हे सांगता येत नाही

ज्योत कुठल्याही रुपात असली तरी तीचा उद्देश मात्र एकच आहे,

'एकच ठावे काम मला
प्रकाश दयावा सकलांला'

या कवितेत प्रकाशाची विविध रूपे एकत्रित केली आहेत. ही ज्योत

कधी पणती, कधी समई, कधी कंदील तर कधी विजेचा दिवा बनून समाजाला प्रबोधनाची सेवा देत राहते. "एकच ठावे काम मला, प्रकाश द्यावा सकलांना" ही भावना प्रत्येक रूपात एकत्रितपणे सांगितली आहे. या कवितेतील ज्योत केवळ प्रकाश नाही तर ती समाजसेवेची भावना घेऊन जळणारी प्रेरणाही आहे.

'तिमिरात उमटली तेजाची पाऊले'ही नामवंत कवी वा.रा.कांत याची कविता स्वातंत्र्य संग्रामात महात्मा गांधी यांची भूमिका सांगणारी ही कविता स्वातंत्र्य, देशप्रेम, त्याग,माणूसपण यांचे दर्शन घडवणारी गांधीजींच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडवणारी ही कविता आपल्या जाज्वल्य स्वातंत्र्य इतिहासात सोनेरी अक्षरात या घटनेची नोंद आढळते,

'तिमिरात उमटली तेजाची पाऊले
जाहली जगाची सलें क्षणामधि फुले'

पारतंत्र्याच्या अंधार युगात तेजाची पावले उमटली,आणि मनामध्ये कायम असलेल्या पारतंत्र्याच्या दुःखाची फुले झाली,एखाद्या अंधाऱ्या रात्रीनंतर तेजस्वी पहाट व्हावी, असा दास्यत्वाला दूर करण्यासाठी मुक्तात्मा अवतरला, व्यथित झालेल्या मनामध्ये बंडाची भावना ज्याने जागवली तो महात्मा कोण होता,

'ते रूप चिरंतर बापूचे आगळे
तिमिरात उमटली तेजाची पाऊले'

महात्मा गांधींच्या तेजस्वी योगदानाचे वर्णन करणारी वा. रा. कांत यांची "तिमिरात उमटली तेजाची पाऊले" ही कविता गांधीजींच्या लढ्याचे स्मरण करायला लावते. पारतंत्र्यात असलेला अंधार त्यांच्या तेजामुळे दूर होतो आणि नवा प्रकाश निर्माण होतो. गांधीजींच्या त्यागाची, संयमाची आणि त्याच्या तेजाची महती कवीने प्रभावीपणे व्यक्त केली आहे.तिमिरात उमटती तेजाची पाऊले अशा शब्दात महात्मा गांधी यांचा गौरव कवीने केला आहे.

'या हो सूर्यनारायणा'ही कवयित्री इंदिरा संत यांची प्रसिद्ध कविता आहे, सुर्यनारायणाचे स्वागत करतांना त्या म्हणतात,

'या हो सुर्यनारायणा
या हो लौकर सोन्याच्या पावलांनी भूषवा हे घर'

त्यांच्या स्वागतासाठी तीने अंगण सारवले, स्वस्तिक रेखाटले, हळद आणि कुंकू मांगल्याचे सूचन करते, सर्व दालने उघडून ती सुर्यनारायणाची आतुरतेने वाट पाहात आहे.सुर्य आकाशाच्या मध्यभागी पोहचून तेजाचा वर्षाव करित आहे,सुर्य किरणांचा घरातील प्रवेश म्हणजे म्हणजे जणू तेजस्वी पित्याचे मायेने फिरवलेल्या हाता सारखे त्यांना वाटते. त्यांच्या स्वागतासाठी सर्व तावदाने, कौलारू झरोके उघडल्यामूळे त्याची रुपेरी किरणे त्याच्या घरामध्ये रेंगाळत राहतात, निरोपाच्या वेळी म्हणजे मावळण्याच्या काळी आपल्या आंगणात यावे असे आमंत्रण त्या देतात, आईच्या मायेने आपल्या कोमल हातांनी बालकाला गोंजारत आंगणात खेळवणाऱ्या सुर्यनारायणाला बघून तीच्या मनातील थकवा निघून जातो या गुलाबी आनंदात आपला संसार न्हाऊन निघावा असे इंदिरा संताना वाटते, अतिशय तरल भावनांची ओतप्रोत अशी ही साधीपण निसर्गदत्त सौदर्याने नटलेली ही कविता आहे.

कवितेत सूर्याचे स्वागत करणाऱ्या प्रत्येक घटकाचे वर्णन आहे. त्यांच्या घरात सूर्यकिरणांचा प्रवेश हे जणू देवाच्या कृपेचे प्रतीक आहे. या किरणांचे स्वागत हे जीवनाच्या नित्य सोहळ्याचे प्रतीक आहे, जे कधीही संपणार नाही. हा उजेड फक्त बाहेरील नाही, तर तो आंतरिकही आहे, जो हृदयातील समृद्धीला प्रकाशित करतो.

'प्रकाश' ही कविता वा.रा.कांत यांनी लिहलेली आहे,तरुणाला उद्देशुन लिहलेली कविता आहे, तरुणांनी परिस्थितीवर मात करून स्वतः चा मार्ग, प्रकाशाचा मार्ग चोखाळला पाहिजे, अन्यायाची चिड असली पाहिजे, गरीब माणसाबद्दल आत्मियता असली पाहिजे, दुःखी माणसाला बघून तुमचे मन हळहळले पाहिजे, अपेक्षा या कवितेतून व्यक्त झाली आहे.

'चाल,चाल अंधारातचि,चाल एकटाची
पाहशील कुठवर तरुणा,वाट प्रकाशाची'

तरुणाला उद्देशुन कवी म्हणतो आंधारात एकटेच पुढे जाण्याची तयारी केली पाहिजे, किती काळ प्रकाशाची वाट बघत बसणार, सोबतीला कोणी नाही,अंधाराचे तुफान सर्वत्र उठले आहे, प्राणांतिक अशी स्थिती निर्माण झाली आहे,मार्गात कितीही काटे किंवा दगड रोवलेले असतील, तरी भविष्यातील संकटाची भिती का बाळगावी, दमन आणि दारिर्द्याने तुझे मन रडेल पिळवटून येईल,पण अश्रुंनी आपल्या मनातील त्यांच्या प्रतीचे प्रेम कमी होऊ देवू नको कारण त्यातूनच आश्वासक चित्र निर्माण होणार आहे,

'चमकति तन अस्थीतून
तेज अग्निकण अजून
जागविली ज्योत ज्यांनी सूर्यमलिकांची'

पिडीतांचा आक्रोश ऐकून, तुझ्या तरुण हदयात त्यांच्या वेदना दूर करण्याची भावना निर्माण होवू दे 'वाट ते प्रकाशिल तुझी जाळ पेटताची, दुःखीत,पिडीत माणसांच दुःखा प्रति सहानुभूतीने विचार करणे त्यांचे दुःख दुर करणे यामुळेच तुझी वाट प्रकाशमान होईल हा विश्वास कवितेच्या शेवटी कवीने व्यक्त केला आहे.

'उगवला नारायण' हे लोकगीत प्रसिद्ध आहे साध्या सोप्या भाषेत उगवणाऱ्या सुर्यनारायणाचे वर्णन या कवितेत केले आहे,

'उगवला नारायण आधी आला माज्या दारी,
दहीभाताची न्याहारी। मग पिधवी धुंडी सारी'

उगवणारा सुर्य माझ्या दारात आला,दहीभाताची न्याहारी करून पुर्ण पृथ्वी फिरायला तो सज्ज झाला, त्याचे दर्शन कुठे कुठे घडते, तर केळीच्या कोक्यात, मळ्यातून फिरतांना, अंगणात प्रकाशला, उदी

कुंकवाचा वटा,शालूचा रंग घेवून आला, जणू लाल शेंदराच्या रंगा सारखा, त्यांच्या जोडीला अंगणात फुललेला चाफा अशा प्रकारे उगवत्या सुर्याच्या साक्षीने निसर्गाने धारण केलेल्या सुंदर रुपाचे दर्शन कवितेत घडते, कितीही समया लावल्या तरी सुर्यनारायणाच्या प्रकाशाची सर येऊ शकणार नाही.

सुर्यनारायणाच्या उगवण्याने रानावनाचे सौंदर्य कसे खुलून दिसते याचे वर्णन या लोकगीतात केले आहे.'तिरिप पिवळी छान,हसे मखमल रानोरान'उगवत्या नारायणाला काय मागावे, सावळे ग मैनाबाई, औरव माग कुंकवाला. अशा प्रकारे सुर्यनारायणाच्या आगमनाने आनंदीत झालेल्या ग्रामीण भागातील स्त्रीने केलेले हे वर्णन आहे.

कवी कुसुमाग्रज प्रकाशपूजक कवी म्हणून  ओळखले जातात 'जीर्ण देवळा पुढे' ही त्यांची कविता एकाकीपणे जळणाऱ्या पणतीचे वर्णन करणारी आहे, मर्यादीत सामर्थ्यांचा विचार न करता दुसऱ्यांना प्रकाश देण्याचा प्रयत्न करण्यासाठी धडपडत राहणाऱ्या पणतीरुपी माणसाला ही कविता अर्पण केली आहे, एकाकी जळणारी पणती हा प्रतीकात्मक दृष्ट्या आशावादाचा आणि अचलतेचा संदेश आहे. अंधःकाराच्या सागरात ती छोटी ज्योत न डगमगता आपल्या प्रकाशाने आजूबाजूचा परिसर उजळण्याचा प्रयत्न करते. भयानक, शिषासारखी रात्र हळूहळू गडद होत असतानाही ती एकाकी ज्योत न डगमगत फडफडत राहते. "शिषा प्रमाणे दाटून पडती सभोवती रात्र, डोहावरती बिंब शलाका थर थरती मात्र"कृ या शब्दांतून अंधारातील निरंतर संघर्ष आणि धैर्याचे दर्शन घडते. कुसुमाग्रजांची ही कविता मानवी आत्म्याच्या साहसाचे रूपक आहे. ती कठीण परिस्थितीत लढणाऱ्या माणसाचे प्रतिरूप, जो संपूर्ण एकांत आणि अनिश्चिततेमध्ये प्रकाश पसरवत असतो.

'जीर्ण अंधारात केली
जळत असे ज्योती
जीर्ण देवापुढे नदीवर
या पाण्यावरती'

आजूबाजूला अंधार पडला असला तरी ही ज्योत एकटीच जळतांना दिसत आहे, आजूबाजूला वातावरण अनुकूल नाही, वारा घिरट्या घालत होता त्यावेळी ती बावरुन जाई तीची चिमूकली ज्योत फडफडायला लागे, सर्वत्र भयंकर एकांत कोणी साद देणारा नाही, घाटाच्या तळाशी पाण्याच्या आवाजाने वातावरणातील भयावहता अधिकच वाढते,

उजळ पायऱ्या करी,जरी ना
मंदिर वा मूर्ती!

आपले विहीत कर्म ती करत राहते मंदिरात वा मूर्तीचा प्रकाश होता आले नाही तरी पायऱ्यांना प्रकाशित करत राहते.

'आत्ता' ही कविता नामदेव ढसाळ यांची प्रकाशपूजक कविता आहे, अंधारयात्रिक होण्याचे नाकारून सूर्योन्मुख होण्याचा विचार मांडणारी ही कविता आहे. भूतकाळातील अज्ञान, दारिर्द्य, जातिभेद, शिक्षणाचा अभाव यामध्ये त्यांचे पूर्वज खितपत पडले होते याचे वर्णन करतांना कवी म्हणतो,' सूर्याकडे पाठ फिरवून शतकांचा प्रवास केला आत्ता अंधारयात्रिक होण्याचे नाकारले पाहिजे'

अनेक शतकापासून अंधारात आपण खितपत पडलो होतो, पण आता मात्र याला आपण नकार दिला पाहिजे, आपले पूर्वज या अंधाराचे ओझे वाहून वाकून गेले, अंधारालाच त्यांनी आपली नियती मानले, पण आपल्या पूर्वजांच्या पाठीवरून हे ओझं उतरवण्याची वेळ आली आहे.

प्रस्तापित लोकांनी निर्माण केलेल्या वैभवासाठी आपले रक्त सांडलेले आहे, आणि आपल्या वाटयाला दगड आले आहेत,पण आत्ता हे सहन करायचे नाही, आभाळमुका घेणाऱ्या हवेल्यांना सुरुंग लावलाच पाहिजे, कारण हजारो वर्षानंतर सुर्यफुले हाती ठेवणारा फकीर डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या रूपाने लाभलेले आहे त्यामुळेच आपण सुर्यफुला सारखे सूर्यांन्मुख झालेच पाहिजे म्हणजे परिवर्तनाची कास धरलीच पाहिजे असा आग्रह कवीने आणला आहे.

बाबासाहेब आंबेडकरांचे तेजस्वी विचार आणि प्रयत्न समाजाला अंधकारातून प्रकाशाकडे घेऊन जाण्यासाठी प्रेरणा ठरले आहेत. या कवितेतून ढसाळांच्या शब्दांनी समर्पकतेने परिवर्तनाचे महत्त्व अधोरेखित केले आहे. "सूर्याकडे पाठ फिरवून शतकांचा प्रवास केला" हे शब्द अंधकारातील खिन्नता दर्शवतात, तर "सूर्यफुला सारखे सूर्यांन्मुख झालेच पाहिजे" हा परिवर्तनाचा आवाहनात्मक ध्यास घेऊन ते भविष्याची उज्ज्वल आशा निर्माण करतात. या कवितेत प्रकाशाचा अर्थ समाजाच्या नवजागृतीच्या स्वप्नाशी जोडला आहे.

आपल्या संस्कृतीत अरुणोदयला महत्त्व आहे त्या अर्थाने आपली संस्कृती प्रकाशपूजक आहे, प्रातःकाळचे सुंदर आणि रम्य वर्णन अनेक मराठी कवितेत आलेले आहे, धनःशाम ही होनाजी बाळाची अमर भूपाळी आहे, अरुणोदयाचे सुंदर वर्णन या कवितेत आले आहे,यशोदा बाळकृष्णाला उठवण्यासाठी प्रभात काळाचे सुंदर वर्णन करताना दिसतात आहे, सृष्टीतील सर्व जीव आपले विहित कर्म करण्यासाठी सिद्ध झाले आहे. अशावेळी आपल्या बाळाला उठवण्यासाठी ती म्हणते,

धनःश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला।
उठिं लौकर वनमाळी उदचळीं मित्र आला.

या भूपाळीत गोकुळा मधील सूर्योदयाचे वर्णन केलेले आहे,मेघा प्रमाणे सावळ्या अशा कृष्णाला उद्देशुन यशोदा म्हणते मित्र म्हणजे सूर्य पर्वतावर आलेला आहे, सायंकाळी वृक्षावर परतलेले पक्षी सुद्धा अरुणोदय होताच चरण्यासाठी उंच आकाशात भरारी घ्यायला लागले आहे, तपस्या करणारे ऋषीमुनी त्यांच्या कार्यासाठी सिद्ध झाले आहे, कावडयात्री मार्गस्थ झाले आहेत, गोपिका सडासंमार्जन करायला लागल्या आहेत, तसेच पाणी भरायला निघालेल्या आहेत अशावेळी कृष्णा तू दहीभाताची न्याहारी करून लवकर तयार हो, कमळाच्या फुलात अडकून पडलेले भ्रमर सुद्धा मुक्त होत चालले आहे,

'पूर्व दिशे मुख धुतले, होतसे नाश तिमिरा

उठिं लवकरी गोविंदा, सांवळ्या नंदा पूर्व दिशा ही उजळलेली आहे जणू तिने आपले मुख स्वच्छ धुतलेले आहे, सुर्य उगवला आहे, तरी

त्याने लवकर उठावे अशी विनंती त्याला करत आहे,

'घरोघरी दीप अखंड त्यांच्या सरसावुनि वाती।
गीत गाती सप्रेमे गोपी सदना येती जाती।

घरोघरीचे असलेल्या अखंड दीपाच्या वाती अरुणोदय झाल्यामुळे आत सरसावण्यात आल्या, आणि गोपिका गीत गात घरोघरी प्रेमाने जायला लागल्या.गृहकार्यात गुंतल्या, यशोदा म्हणते' आनंदकंदा प्रभात झाली उठ सरली रात्र'

गोपिका अलंकार घालून नटायला लागली,प्रत्येक जण आपापल्या मान्यतेनुसार पूजाअर्चा करायला लागले आश्रमातील निराजंन घालणारे ऋषिगण अरुणोदय झाल्याबरोबर ध्यानधारणा करण्यात मग्न झाले, विद्यार्थी विघा ग्रहण करण्यासाठी गुरु जवळ पोहचले, याज्ञिकजन कुंडामध्ये आहुती अर्पण करायला लागले,' रविप्रभा पडुनिया उजळल्या शुद्ध दिशा दाही' अशा प्रकारे अरुणोदयाचे महत्व या प्रकाशपूजक भूपाळीत आलेले आहे.

प्रकाशपूजक मराठी कवितांचे हे दर्शन केवळ बाह्य प्रकाशाचे महत्त्व अधोरेखित करत नाही, तर प्रत्येक व्यक्तीच्या अंतर्मनातील तेजाची महती देखील उलगडते. सुधीर मोघे, बहिणाबाई, कुसुमाग्रज आणि इतर अनेक कवींनी त्यांच्या रचनांमधून अंधःकारावर विजय मिळवत उन्नतीच्या दिशेने मार्ग दाखवला आहे. अशा कवितांमधून जीवनातील संघर्षांवर मात करत चैतन्याचा, ज्ञानाचा आणि शाश्वत आशेचा साक्षात्कार घडतो. या रचनांमधून मिळणारी प्रेरणा आणि प्रकाशाचा उदात्त संदेश यांचा संगम ही मराठी कवितेतील एक अमूल्य देणगी आहे, ज्याने अनेक पिढ्यांना प्रोत्साहित केले आहे आणि पुढील पिढ्यांसाठीही ही प्रेरणा कायम राहील.

**संदर्भ ग्रंथः**

1. आजची मराठी कविताः संपादक प्रा.बसंत बापट,चारुशीला गुप्ते, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.
2. त्रिदलः संपादक डॉ. स्हेहल तावरे,डॉ. दत्तात्रय पुंडे, स्नेहवर्धन प्रकाशन, पुणे.
3. अर्वाचीन मराठी काव्यदर्शनः डॉ. अक्षयकुमार काळे, श्री.ना.बहहट्टी प्रकाशन नागपूर,१६८८.
4. काव्यधाराः संपा.डॉ.केशव फाले, प्रशांत पब्लिकेशन २०१५.
5. मराठी कविता आणि आधुनिकताः डॉ. यशवंत मनोहर,धम्म प्रकाशन, नागपूर.
6. स्वातंत्र्योत्तर मराठी कविताः संपा तु.शं.कुलकर्णी, साहित्य अकादमी २००८.